**चंद्रपूर जिल्ह्यातील मद्य परवाने मंजूर करताना झालेला गैरव्यवहार, अनियमितता व लाचखोरीच्या अनुषंगाने प्राप्त तक्रारीबाबत सखोल चौकशी करण्याकरीता गठीत विशेष तपास पथकास (SIT) अहवाल सादर करण्याकरिता मुदतवाढ देण्याबाबत.....**

# महाराष्ट्र शासन

## गृह विभाग

**शासन निर्णय क्रमांक : व्हीआयपी०५२४/प्र.क्र.३८/पोल-१३**

दुसरा मजला, मंत्रालय,
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,
मुंबई ४०० ०३२.

**दिनांक :** २७ मे, २०२५

वाचा :-

१) शासन निर्णय, समक्रमांक दिनांक १५ ऑक्टोबर, २०२४
२) अपर पोलीस आयुक्त, लाचलुचपत प्रतिबंधक विभाग, मुंबई यांचे क्रमांक ५५०/लाप्रव/बृमुंवि/अपोआ/चंद्रपूर(SIT)/२५, दिनांक १६.०१.२०२५ रोजीचे पत्र.
३) अपर पोलीस आयुक्त, लाचलुचपत प्रतिबंधक विभाग, मुंबई यांचे क्रमांक ५५०/लाप्रव/बृमुंवि/अपोआ/चंद्रपूर(SIT)/२५, दिनांक १६.०४.२०२५ रोजीचे पत्र.

**प्रस्तावना** :- चंद्रपूर जिल्ह्यातील मद्य परवाने मंजूर करताना झालेला गैरव्यवहार, अनियमितता व लाचखोरीच्या अनुषंगाने प्राप्त तक्रारीबाबत सखोल चौकशी करण्याकरीता श्री. संदीप दिवाण, भापोसे, पोलीस उपमहानिरीक्षक, लाचलुचपत प्रतिबंधक विभाग, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांच्या अध्यक्षतेखाली संदर्भ क्रमांक (१) येथे नमूद शासन निर्णयान्वये विशेष तपास पथक (SIT) गठीत करण्यात आले आहे.

प्रस्तुत प्रकरणातील चौकशीची व्याप्ती मोठी असून अर्जदार यांच्या आक्षेपांच्या अनुषंगाने त्यांचेकडे चौकशी करून त्यांचा सविस्तर जबाब नोंद करणे, अधीक्षक, राज्य उत्पादन शुल्क, चंद्रपूर यांचेकडून प्राप्त अबकरी अनुज्ञप्तींच्या कागदपत्रांची पडताळणी करून संबंधीतांचे जबाब नोंदविणे, अधीक्षक, राज्य उत्पादन शुल्क, चंद्रपूर यांचेकडून उर्वरित अबकरी अनुज्ञप्तीची माहिती व कागदपत्रे प्राप्त करून त्याअनुषंगाने चौकशी करणे इ. बाबींच्या अनुषंगाने चौकशी पूर्ण करून अहवाल सादर करण्यासाठी ०३ महिन्यांची मुदत वाढवून मिळणेबाबतची विनंती विशेष तपास पथक (SIT) अध्यक्ष तथा अपर पोलीस आयुक्त, लाचलुचपत प्रतिबंधक विभाग, मुंबई यांनी संदर्भ क्रमांक (२) येथे नमूद पत्रान्वये केली आहे.

तसेच, चंद्रपुर जिल्ह्यात दि. ०८.०६.२०२१ रोजी नंतर वितरीत करण्यात आलेल्या अबकारी अनुज्ञप्ती/परवान्याविषयी असलेल्या आक्षेपांबाबत चंद्रपुर जिल्ह्यातील जनतेकडून प्राप्त तक्रारी व इतर बाबींच्या अनुषंगाने चौकशी करून अहवाल सादर करण्यास आणखी तीन महिन्यांचा कालावधी लागण्याची शक्यता असल्याने सदर प्रकरणात चौकशी पूर्ण करून अहवाल सादर करण्यासाठी ०३ महिन्यांची मुदत वाढवून मिळणेची विनंती विशेष तपास पथक (SIT) अध्यक्ष तथा अपर पोलीस आयुक्त, लाललुचपत प्रतिबंधक विभाग, मुंबई यांनी संदर्भ क्रमांक (२) येथे नमूद पत्रान्वये केली आहे.

त्याअनुषंगाने, प्रस्तुत प्रकरणाची चौकशी करण्याकरिता गठीत करण्यात आलेल्या विशेष तपास पथकास (एसआयटी) मुदतवाढ देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**<u>शासन निर्णय</u>** :-

चंद्रपूर जिल्ह्यातील मद्य परवाने मंजूर करताना झालेला गैरव्यवहार, अनियमितता व लाचखोरीच्या अनुषंगाने प्राप्त तक्रारीबाबत सखोल चौकशी करण्याकरीता श्री. संदीप दिवाण, भापोसे, पोलीस उपमहानिरीक्षक, लाचलुचपत प्रतिबंधक विभाग, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांच्या अध्यक्षतेखाली संदर्भ क्रमांक (१) येथील शासन निर्णयान्वये गठीत विशेष तपास पथकास (SIT) अहवाल सादर करण्याकरिता दि.३१.०७.२०२५ पर्यंत मुदतवाढ देण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक २०२५०५२७१६००२१४६२९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

HEMANTKUMA
R K MOHAN

Digitally signed by HEMANTKUMAR K MOHAN
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=HOME DEPARTMENT,
2.5.4.20=665e4814c90a1264436c529dc6c05a8d08206a78cf37fc3f6b7b16c7b2b1185a, postalCode=400032, st=Maharashtra,
serialNumber=78938E4677D1CBB922AFE9D54F1D35321C4F2D3346E218A30B4353C48E28488E, cn=HEMANTKUMAR K MOHAN
Date: 2025.05.27 16:02:16 +05'30'

**(हेमंतकुमार मोहन)**
**कार्यासन अधिकारी, गृह विभाग**

**प्रत :**

१) मा. राज्यपाल यांचे प्रधान सचिव.
२) मा. मुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव.
३) मा. उपमुख्यमंत्र्याचे सचिव.
४) मा. विरोधी पक्षनेता, विधानसभा/विधान परिषद, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई.
५) सर्व सन्माननीय संसद, विधानसभा, विधान परिषद सदस्य, महाराष्ट्र राज्य.
६) सर्व मा. मंत्री/राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव.
७) मा. मुख्य सचिव यांचे वरिष्ठ स्वीय सहायक.
८) अपर मुख्य सचिव (राज्य उत्पादन शुल्क), मंत्रालय, मुंबई.
९) प्रधान सचिव, विधानमंडळ सचिवालय, विधानभवन मुंबई.
१०) पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
११) श्री. संदीप दिवाण, भापोसे, पोलीस उपमहानिरीक्षक, लाचलुचपत प्रतिबंधक विभाग, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
१२) निवडनस्ती (पोल-१३).